राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाच्या शिफारशीनुसार मृत बंदीच्या जवळच्या नातेवाईकास रु.५०,०००/- (पन्नास हजार) इतकी आर्थिक मदत मंजूर करण्याबाबत.

---

महाराष्ट्र शासन,
गृहविभाग
शासन निर्णय क्रमांक-एमआयएस ०१९८/६(२३)पीआरएस-२,
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक २६ मे, १९९८.

वाचा:-१) राष्ट्रीय मानवी हक्क आयोग(विधी) नवी दिल्ली यांचे पत्र क्र.३६/१३(१४५)/९६-एलडी दिनांक ६ मार्च, १९९८.

२) कारागृह महानिरीक्षक, यांचे अ.शा.प.क्र.बीजीटी/१९९८-९९/कक्ष-४, दिनांक ७.४.१९९८.

येरवडा मध्यवर्ती कारागृहातील कैदी, बाळू काळू शेळके (वय वर्षे-३५) यांना दिनांक २८.७.१९९६ रोजी अटक करण्यात आली होती. तुरुंगातच त्यांची प्रकृती खालावल्यामुळे ससून रुग्णालय, पुणे येथे त्यांना दिनांक ३१.७.१९९६ रोजी दाखल करण्यात आल्यानंतर त्या रुग्णालयामध्येच ते दिनांक २.८.१९९६ रोजी मृत्यू पावले.

शेळके यांच्या मृत्यूनंतर शवविच्छेदन अहवालात "धक्क्यामुळे डोक्याला जखमा" असा अहवाल दिल्याचे दिसून येते. सदर शवविच्छेदन अहवाल राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाने फॉरेन्सिक मेडिसिन, नवी दिल्ली येथे अधिक तपासणीसाठी पाठविला.

शेळके यांच्या मरणोत्तर शवविच्छेदनातील अहवाल, तसेच फॉरेन्सिक मेडिसिन नवी दिल्ली येथील तज्ञांचे अभिप्राय पाहता सदर घटना ही नैसर्गिक मृत्यू नसून ~~मृत्यूपूर्वी~~ मृत्यूपूर्वी धारदार शस्त्राचा वापर होऊन जखमा झाल्यामुळे श्री. शेळके मृत्यू पावले व या जखमा तुरुंगात झाल्यामुळे त्या कारागृह कर्मचाऱ्यांकडून झाल्या असाव्यात असा निष्कर्ष निघतो.

राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाने अशी शिफारस केली की, महाराष्ट्र शासनाने मयत बाळू काळू शेळके यांच्या जवळच्या नातेवाईकास रु. ५०,०००/- अंतरिम मदत म्हणून [illegible] तत्पर देण्यात यावे. प्रस्तुत प्रकरणाचे शासनाने अवलोकन करून व राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाची शिफारस विचारात घेऊन मयत बाळू काळू शेळके यांच्या जवळच्या नातेवाईकास आर्थिक मदत

....२/-

फक्त
म्हणून रू.५०,०००/-[ रूपये पन्नास हजार ] इतकी रक्कम प्रदान करण्यास शासन मंजूर देत आहे. याबाबतचा खर्च मागणी क्र.बी-७ २०५६-तुरूंग,१०१[एक] मध्यवर्ती कारागृह-२० इतर खर्च[२०५६००२५२०] या लेखाशिर्षाखाली सन १९९८-९९ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.सीआर ३३६/९८/व्यय८ दिनांक १८.५.१९९८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

[ सा. स. नाईक ]
कार्यासन अधिकारी,गृहविभाग,महाराष्ट्र शासन.

प्रति,

कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे
कारागृह उप महानिरीक्षक[मुख्यालय] पुणे/पश्चिम विभाग,पुणे/मध्य विभाग/ औरंगाबाद/पूर्व विभाग नागपूर/दक्षिण विभाग,मुंबई.
महालेखापाल-१[ लेखा व अनुज्ञेयता ]महाराष्ट्र,मुंबई
महालेखापाल-१[ लेखा परिक्षा ] महाराष्ट्र,मुंबई
महालेखापाल-२[ लेखा व अनुज्ञेयता ]नागपूर
महालेखापाल-२[लेखा परिक्षा],महाराष्ट्र,नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई.
कोषागार अधिकारी,पुणे
वित्त विभाग[व्यय-८]
गृहविभाग[बीपुडने१]
अवर सचिव,गृहविभाग,पीआरएस-१
निवड नस्ती.